**शेतीपिकांच्या नुकसान ठरविण्यासाठी “सामान्यकृत फरक वनस्पती निर्देशांक” (NDVI) या अतिरिक्त निकषाबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- सीएलएस २०२३/प्र.क्र.२८६-(I)/म-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०२ ऑगस्ट, २०२४

वाचा :-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.६७/म-११,दि.२४.०१.२०२३.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३,दि.२७.०३.२०२३
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२३/प्र.क्र.५२/म-३,दि.२२.०६.२०२३
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२३/प्र.क्र.२७२/म-३,दि.०१.०१.२०२४

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन दिनांक २२ जून, २०२३ च्या शासन निर्णयामध्ये दुष्काळ वगळता इतर नैसर्गिक आपत्तीमुळे झालेल्या नुकसानीकरीता मदत देण्यासाठी **“सामान्यकृत फरक वनस्पती निर्देशांक”** (NDVI) हा अतिरिक्त निकष लावण्यात आला आहे. तथापि, दिनांक ०१ जुलै, २०२४ च्या मंत्रिमंडळ उपसमितीच्या बैठकीत **“सामान्यकृत फरक वनस्पती निर्देशांक”** (NDVI) **निक**ष तपासण्यासाठी कृषि विभागाने अद्यावत यंत्रणा उभारणी करण्यापर्यंत सदर निकष लागू करु नयेत, अशी शिफारस करण्यात आली. याबाबत दिनांक २३ जुलै, २०२४ च्या मंत्रिमंडळ बैठकीत यावर चर्चा झाली. त्या अनुषंगाने खालील प्रमाणे आता शासनाने निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१) वर नमूद दिनांक २२.०६.२०२३ च्या शासन आदेशामध्ये अंशत: सुधारणा करुन दि.०१.०१.२०२५ पासून दुष्काळ वगळता, इतर नैसर्गिक आपत्तीमुळे झालेल्या शेतीपिके नुकसानीकरीता मदत देण्याकरिता "सामान्यकृत फरक वनस्पती निर्देशांक” (Normalized Difference Vegetative Index, NDVI) हा निकष लागू करण्यात येत आहे.
२) कृषि विभाग दि.०१.०१.२०२५ पर्यंत "सामान्यकृत फरक वनस्पती निर्देशांक” (Normalized Difference Vegetative Index, NDVI) चे निकष तपासण्यासाठी अद्यावत प्रणाली उभी करण्याची कार्यवाही करेल.
३) अप्पर मुख्य सचिव (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली प्रधान सचिव (कृषि), प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन) यांची समिती स्थापित करण्यात येत आहे. ही समिती नुकसानग्रस्त खातेदारांच्या क्षेत्राचे अक्षांश /रेखांश नकाशा (Cadastral Map) अद्यावत करण्याबाबत तसेच आवश्यक ती उपाययोजना सूचवण्याबाबत अभ्यास करेल. मध्य प्रदेशमध्ये हा निकष लागू केला असल्याने, त्याबाबत तेथील कार्यपध्दतीची पाहणी ही समिती करेल.

४) प्रचलित पध्दतीप्रमाणे विभागीय आयुक्त यांचेकडून प्राप्त झालेल्या शेतीपिके नुकसानीचे मदत देण्याकरीताच्या प्रस्तावांबाबत तातडीने निधी मंजूरीचा शासन निर्णय निर्गमित करेल.

५) सर्व जिल्हाधिकारी यांनी दिनांक ०१.०१.२०२५ पर्यंत शेतीपिक नुकसानीचे प्रचलित पध्दतीनेच पंचनामे करुन निधी मागणीचे प्रस्ताव विभागीय आयुक्तांमार्फत शासनास पाठविण्यात यावेत.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०८०२१८४००२२७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SANJAY JAYRAM KUDAVE

Digitally signed by SANJAY JAYRAM KUDAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=0499fc5d7e388de7a10d303d048c7ab3e4aaf97e3f5733c079f584506fbfaae7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=377DD6A98181A786A7A6EEFB762E75E4DD790D349657CF49A47DFF709B61A055, cn=SANJAY JAYRAM KUDAVE
Date: 2024.08.02 18:54:41 +05'30'

**( संजय कुडवे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सर्व विभागीय आयुक्त
४. आयुक्त कृषि, कृषि संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. सर्व जिल्हाधिकारी
६. संचालक, आपती व्यवस्थापन, मंत्रालय, मुंबई.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा
८. संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
९. संचालक माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१०.कुलसचिव, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी
११.उपसचिव/ सहसचिव (आव्यप्र-१/आव्यप्र-२/म-७/म-११/ब-१/पीएसी/पीएसी-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.कार्यासन (निवडनस्ती).

**प्रत माहितीसाठी अग्रेषित-,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानभवन,मुंबई
४. विधानमंडळाचे सर्व सन्माननीय सदस्य,
५. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र मुंबई/नागपूर (प्रत्येकी ३ प्रती)
६. महालेखापाल - १/२ (लेखापरिक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर (प्रत्येकी ३ प्रती)
7. प्रधान सचिव (मदत पुनर्वसन) यांचे स्वीय सहाय्यक